श्यामा

# सुगंधी वीणा

ग. दि. माडगूळकर

सुधीर फडके

मूल्य दोन रुपये

# अनुक्रमणिका

# छेडण्यापूर्वीं

माझ्या कवितांचा संग्रह अद्याप प्रकाशित झालेला नाहीं. त्यापूर्वीं असें एकादें पुस्तक प्रसिद्ध करण्यास माझा प्रामाणिक विरोध होता. ग्रामोफोन, रेडिओ, चित्रपट इत्यादिकांसाठीं मी असंख्य रचना केल्या आहेत. त्यांतल्या कांहीं फार लोक-प्रियही झालेल्या आहेत पण त्या माझ्या ‘ कविता ’ नव्हत.

माझे जुने मित्र श्री. ना. वि. चिरमुले यांची चिकाटी व गीतगायकांची मागणी यांचा अनादर करणें अशक्य झाल्यानेंच या रचनांच्या प्रसिद्धीकरणास मी मान्यता दिली.

या ‘ रचनांत ’ कुणाला काव्य दिसलें तर ठीकच पण एक प्रामाणिक रसिक म्हणून माझें मत मात्र प्रारंभींच सांगून टाकणें मला अगत्याचें वाटतें. यांतलीं गीतें लोकप्रिय होण्यास श्री. सुधीर फडके, यांच्या ‘ वीणे ’ चा भाग मोठा आहे. माझें ‘ कवित्व ’ केवळ वासापुरतेंच आहे.

विजया दशमी
१८७१
एकनाथधाम, पुणें ४.

—ग. दि. माडगूळकर

‘ सुगंधी वीणें ’तील माझ्या चालींचे स्वर लेखन माझे मित्र श्री. दत्ता डावजेकर यांनीं केलें आहे. त्यांच्या पाठीमागें कामाचा फार मोठा व्याप असूनही माझ्या विनंतीला होकार देऊन तत्परतेनें स्वर लेखन करून दिलें याबद्दल मी त्यांचा अतिशय आभारी आहे.

—सुधीर फडके

# गवसणी सोडतां सोडतां

जव्हारीदार तंबोऱ्यांची जोडी षड्जपंचम बोलूं लागली आहे—तबला सुरांत जमवून तबलजी डग्याची नरमाई अजमावूं लागला आहे—सारंगिया अखेरची खात्री घेऊन खुंटी पिरगळण्याची थांबून गायकाकडे रागाचा अंदाज घेण्याच्या इच्छेनें षड्ज खेचूं लागला आहे—पेटीवालाही उगाच पट्ट्यांची चाळवाचाळव करीत आहे—स्वतः गायक एकजीव झालेल्या षड्जाचा 'मझा' घेत डोळे झांकून बसला आहे—अशा वेळीं 'हं बुवा होऊं द्या सुरवात!' हें फर्मावून मध्येंच त्याची आणि इतर आतुर रसिकांची दृष्टि आपल्याकडे खेंचून घेणाऱ्या आगाऊ श्रोत्यासारखी ह्या "सुगंधी वीणे"ला प्रस्तावना लिहितांना माझी स्थिति झाली आहे. जगांत सुगंध आणि सूर ह्या दोनच चीजा अशा आहेत कीं ज्या सिद्ध करावयाला मध्यस्थाची आवश्यकता लागत नाहीं. परंतु यशस्वी जलशांत आपण बुवांच्या तंबोऱ्याची गवसणी सोडली होती ही देखील कलासेवाच केली असें मानणाऱ्या भाबड्या रसिकाप्रमाणें मी ह्या संग्रहांत माझ्याही सेवेचा भाग साधून घेत आहे. सुधीर फडक्यांच्या 'वीणेला' सुगंध देणारे ग. दि.

माडगूळकर आणि त्या सुगंधी वीणेची गवसणी काढून ती रसिकांच्या मनोविनोदनासाठीं त्यांच्यापुढें ठेवणारा मी–हे तिघेही ह्याच कलेच्या दरबारांतले पाईक आहोंत. केवळ पुस्तकांत ही प्रस्तावना लिहितांना " श्रीयुत सुधीर फडके हे सुप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक" असली औपचारिक भाषा लिहिण्याचा माझ्यावर प्रसंग येत आहे, नाहीं तर 'सुध्याच्या चाली' आणि 'गदिमाचीं गाणीं' ही आमची नेहमीची भाषा ! !

आज महाराष्ट्रांत गल्लोगल्ली ह्या चाली आणि गीतें गेलीं आहेत; लोकांनीं हीं गाणीं आपलीशीं करून ह्या दोन्ही कलावंतांचा मनापासून गौरव केला आहे. कित्येकांच्या जीवनांतल्या विविध आठवणीही या गीतांभोंवतीं गुंफल्या गेल्या असतील. 'घनश्याम नयनी आला' या गीताच्या श्रवणानें कितीतरी युवतींच्या नयनांत त्यांचा घनश्याम आला असेल तर–'सावळाच रंग तुझा' असं म्हणून कितीतरी प्रियकरांनीं आपल्या सावळ्या प्रेयसींच्या कपोलावर आरक्तता आणली असेल, " रुणझुणत्या पांखरा तूं जा माझ्या माहेरा" हें गीत ऐकून अनेक सासुरवासणींचे डोळे पाणावले असतील तर–'गोजिरी गोजिरी मुलें'च्या साथींत कितीतरी बालकें स्वप्नांच्या बगीच्यांत गेलीं असतील. 'अपराध मींच केला शिक्षा तुझ्या कपाळीं' ह्या गीतानें कित्येक सुकल्या स्मृतीवर पुनश्च अश्रुसिंचन झालें असेल तर–'वेद मंत्राहून आम्हां वंद्य वंदे मातरम्' म्हणतांना स्वतंत्र भारतांतील कित्येक तरुण अंतःकरणें अभिमानानें स्पंदन पावलीं असतील. महाराष्ट्राबाहेर पोटामागें दूर हिंडणाऱ्या कोणा मावळ्याला.

" पाणंदीतिल तांबडमाती
श्रावणधारा तीवर झडती
शिवेलगतच्या वळणावरती

हिरवें इरले घेऊन राही जांभुळ तो घनदाट " हे स्वर तबकडी-वरून कानीं येतांच आपल्या " मळ्याची वाट " डोळ्यांपुढें उभी राहिली असेल. ज्यांच्या कानांवरून हीं गीतें गेलीं त्यांना कसल्या तरी पुनःप्रत्ययानें क्षणभर हर्षित केलें कीं झालें हीच ह्या गीतकाराची आणि स्वर योजकाची अपेक्षा आहे. पारिजातकाच्या फुलांचे आयुष्य घेऊन आलेली आणि त्यांचाच सुगंध वांटणारी हीं गीतें आहेत. ह्यांत सुरांची घराणेदार मिजास नाहीं—किंवा अमर आणि अक्षर वाङ्मयांत व अभिजात संगीताच्या दरबारांत मानाचें स्थान मिळावें ही ईर्षा नाहीं. पण पारिजातकाचा अस्सलपणा मात्र यांत अवश्य आहे. कारण ह्या सुगंधीवीणेची जडणघडण करणारे कलाकार " झरा मूळचाची झरा " ह्या जातीचे आहेत. श्री. ग. दि. माडगूळकर हे इथें आपण केवळ 'वासापुरते' आहोंत असें सांगत असले तरी 'मूळ कुपी' भक्कम आहे. अत्तराचा वास यायला सगळी कुपी कांहीं नाकांत भरावी लागत नाहीं, एक 'फाया' पुरतो. सुधीर फडके ह्यांचेंही घराणें खानदानीं गायकाचें आहे. श्री. पाध्ये बुवांचा आशीर्वाद आणि उदार मनानें दिलेली विद्या घेऊनच त्यांनीं आपला कला-संसार थाटला आहे. त्यांतल्या अंगणांत त्यांनीं लावलेली ही छोटी बाग आहे. दोघांही कलावंतांच्या अंतःकरणांत ही जाणीव आहे कीं—महाराष्ट्रानें आपल्या ह्या छोट्या प्रांगणांतल्या फुलवेलींचे कौतुक केलें आहे आणि त्याच बगीच्यांतला हा छोटा गुच्छ आपण देत आहों. ह्या गुच्छाचें जीवीत किती आहे हें आज कोणीच ठरवूं शकणार नाहीं. परंतु मराठी रसिकांनीं केलेलें ह्या दोन्ही कलावंतांचें कौतुक मात्र त्यांच्या कृतज्ञ अंतःकरणांत कायमचें वास्तव्य करून राहिलें आहे.

प्रत्येक रसिक हा बीज रूपांतला कलावंत असतोच. असल्या रसिकाला थोड्याबहुत प्रमाणांत प्रतिभाही असते, परिष्करणाची इच्छा असली

तर कलावंत व्हावयाला आणखी निराळ्या कशाची आवश्यकता नाहीं. असल्या अभ्यासू रसिकासाठीं सुप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक दत्ता डावजेकर यांनीं ह्या ध्वनिमुद्रित गीतांची " सरगम " ही दिलेली आहे. ह्या 'सुंगधी वीणे'च्या साहाय्यानें अनेक जीवनांत सुरेलपणा आणि सुगंध येवो अशी अपेक्षा बाळगून 'गवसणी सोडायच्या निमित्तानें' रसिकांच्या पुढें येऊन, चार शब्द सांगून घेण्याची संधि साधून, ही प्रस्तावना संपवितों.

दीपावली पाडवा शके १८७१
आश्रम, पुणें ४.

पु. ल. देशपांडे

# घनश्याम नयनीं आला

: १ :

घनश्याम नयनीं आला
सखे, मी काजळ घालूं कशाला ?
रोमांचांनीं नटली काया
हिरे, माणिकें कशास वांया ?
कशास मोहनमाला ?
सखे, मी काजळ घालूं कशाला ?
कटीभोंवतीं कर कृष्णाचे
लेणें ल्यालें आभासाचें
कशास मग मेखला ?
सखे, मी काजळ घालूं कशाला ?
कृष्णसख्याची मोहक मुरली
रात्रंदिन या कानीं भरली
शृंगार सर्व झाला !
सखे, मी काजळ घालूं कशाला ?

# गोकुळिंचा राजा

गोकुळिंचा राजा
माझा गोकुळिंचा राजा !

देवकिनंदन
श्यामसुलोचन
गोपगड्यांसह खेळे हांसुन
लेवुनि पानफुलांच्या साजां
गोकुळिंचा राजा !

वाम बाहुवर कपोल डावा
अधरिं आडवा धरितो पांवा
मोहन कुंजविहारी माझा
गोकुळिंचा राजा !

यमुनातीरीं उभ्या गौळणी
रूप घेति तें नयनीं भरूनी
सोडुनि जलभरणाच्या काजां
गोकुळिंचा राजा !

# वृंदावनांत राधा

वृंदावनांत राधा,
साधून येइ वेळा
घननीळ माधवाला,
एकांतिं भेटण्याला
अधरीं धरून मुरली,
होता उभा विहारी
दोघांत येइ तिसरी,
तिज राग येइ भारी
हिसकून घेइ मुरली
हृदयास लावि राधा
करितो विनोद कान्हा,
हंसुनी हळूच साधा
वक्षावरी तुझ्या ही–
मुरली सुरेख सजली
स्वरवैभवाविना गे,
ती बीनरूप झाली!

# सांवळाच रंग तुझा

सांवळाच रंग तुझा
पावसाळी नभापरी
आणि नजरेंत तुझ्या
वीज खेळते नाचरी !
सांवळाच रंग तुझा
चंदनाच्या बनापरी
आणि नजरेंत तुझ्या
नाग खेळती विखारी !
सांवळाच रंग तुझा
गोकुळिंच्या कृष्णापरी
आणि नजरेंत तुझ्या
नित्य नादते पांवरी !
सांवळाच रंग तुझा
माझ्या मनीं झांकळतो
आणि नजरेचा चंद्र
पाहूं केव्हां उगवतो ?
सांवळाच रंग तुझा
करी जीवा बेचैन
आणि नजरेंत तुझ्या
झालों गडे बंदीवान !

# डुले चंद्रमा पुनवेचा : ५

डुले चंद्रमा पुनवेचा
नील जलावर हलते नौका, हिंदोला चांदीचा !

जलांत लहरी
मनांत लहरी
नील सागरीं
नभ चंदेरी
हा सोहळा ऐक्याचा
डुले चंद्रमा पुनवेचा !

शांत शांत बघ दुनिया ही झोपली
वाऱ्याचीही कुजबुज विरली
मंद जराशी चलुं दे वल्हीं
लुटुंया कलश सुधेचा
डुले चंद्रमा पुनवेचा !

# जा घेउन संदेश पांखरा

: ६ :

जा घेउन संदेश पांखरा
जा घेउन संदेश
मानसींच्या राजहंसा, जा घेउन संदेश !

मोत्यांवरचें मोहक पाणी
सांठविलें मी शाई म्हणुनी
मुग्ध कळीची करुन लेखणी
आळविला निषधेश !
जा रे जा घेउन संदेश !

कमलदलावर हृदय ओतिलें
नकळत त्याचें अक्षर झालें
प्रेमप्रत्र हें पहिलें वहिलें
मदनाचा आदेश !
जा रे जा घेउन संदेश !

# मंजुळ रव भरला वनांतरीं

मंजुळ रव भरला वनांतरीं
कुणि अलगुज वाजवि अंधारीं

नकळे कुठुनी भरला वारा
विराग मनिंचा विरला सारा
लुकलुकला नभिं एकच तारा

तो मंद किरण ये येथवरी
मंजुळ रव भरला वनांतरीं !

उभी सांवली दिसली तोंवर
निरखुनि बघतां क्षितिजावर
घुमवित होता पांवा प्रियकर

शोधिलें जया मी रानभरीं
मंजुळ रव भरला वनांतरीं !

# कुणि पाहील ना !

कुणि पाहील ना, कुणि पाहील ना
चाहुल कुणितरी घेईल ना !

आंबराइ जरि गर्द सभोंतीं
वरती तारा तेजवती
मेघांआडुनी, डोळे मिचकुनी

खुदूखुदू त्या हंसतील ना !
कुणि पाहील ना, कुणि पाहील ना

ऐकुनि अपुली मधुर बोलणीं
जागी झाली कोकिळ कोणी
हळुंच देतसे साद गडे ती

जागवील ना साऱ्या वना
कुणि पाहील ना, कुणि पाहील ना

# नयनीं तुझ्या आंसू येतील कां ?— : ९ :

नयनीं तुझ्या आंसू येतील का ?

बाळपणींचा तुझा नि माझा आठवुनी सहवास
नयनीं तुझ्या आंसू येतिल का ?

वाऱ्यावरचीं दोन पांखरें सोडुन एकामेकां
दोन दिशांना उडुनी गेलीं कलह करूनी लटका

अंतराळिंच्या निळ्या ढगावर मीलन त्यांचें होईल कां ?
नयनीं तुझ्या आंसू येतिल कां ?

# चांदाचीं किरणें विरलीं

: १० :

चांदाचीं किरणें विरलीं
प्रीतीच्या माझ्या राजा, वाट किती पाहुं रे ?

पूर्वदिशा हांसे मजला सांग कशी साहुं रे ?
प्रेमभरें रंगे वारा धुंद लताकुंज रे

अंतरिंचीं रोपें जळलीं !
प्रीतीच्या माझ्या राजा, वाट किती पाहुं रे ?

भानुतेज उजळे जगतीं अंतरांत रात रे
सरोजिनी फुलल्या सलिलीं भृंगतती गात रे
निराशाच अंतीं हातीं
प्रीतीच्या माझ्या राजा, राणि तुझी बावरे
वाट किती पाहुं रे ?

# मावळतीला दिस गेला !



मावळतीला दिस गेला
झुळुझुळु झुळुझुळु वारा सुटला !
घरधनिणीचं नाजुक हात
फिरत्याल तुमच्या पाठीवरतं
येत्या सुगीच्या गोष्टी बोलत
घ्याल इसावा रातीला
पेंड करडिची रवथाला
माबळतीला दिस गेला !
दिवं लागलं गांवामंदीं
उभि असंल ती दारामंदीं
चल राजा, परधान्या रं चल जलदी
पांखरं निघालीं घरट्याला
झुळुझुळु झुळुझुळु वारा सुटला
मावळतीला दिस गेला !
चांदण्यांत मग खाट मांडुनी
आमी बी दोगं राजा-रानी
गुलगुल गुलगुल ग्वाड बोलुनी
लाजवुं वरच्या चांदाला
आनिक त्येच्या चांदनिला
मावळतीला दिस गेला !

# अंगाई, अंगाई राजकुमारी

: १२ :

अंगाई, अंगाई राजकुमारी
शांत झोपली दुनिया सारी !
आकाशींच्या पाळण्यांत
पेंगुळली चंदाराणी
गुणगुणे वनदेवी
तिला गोड गाणीं
किरणांच्या गुंफणींची झुलवित दोरी !
अंगाई, अंगाई राजकुमारी !
हिरवळिच्या बिछान्यांत
रानफुलें पेंगतात
मूककळ्या झोपीं गेल्या लतिकांच्या अंकावरीं !
अंगाई, अंगाई राजकुमारी
नाचविशी कां हात सानुले
देवदूत का कुणी पातले ?
स्वप्न नवें कां तुला आणिलें ?
हंसूं म्हणुनि कां गालावरी ?
अंगाई, अंगाई राजकुमारी

# हलकेंच कळ्यानों उमला

: १३ :

हलकेंच कळ्यांनो उमला
लागते झोंप राजाला
पाकोळिच्या आवाजानें, येईल जाग ना त्याला !
कोटरांतल्या मैनाबाई
तिथेंच थोडी थबकुन राही
ललतराग गाउन वेडे, जागवूं नको छकुल्याला !
हलकेंच कळ्यांनों उमला, लागते झोंप राजाला !
फिरत्या पवना, थांब पळभरी
उषे, आपुला पदर सावरी
क्षितिजाच्या या उंबरठ्यावर वाजवूं नको पाउलां !
हलकेंच कळ्यांनों उमला, लागते झोंप राजाला !
दाहि दिशांनो, गुलाल फेंका
अरुणरथाला पळभर रोखा
मावळत्यांचे हार घालुनी स्वागतांत रमवा त्याला !
हलकेंच कळ्यांनो उमला, लागते झोंप राजाला !

# गोजिरीं गोजिरीं मुलें— : १४

गोजिरीं गोजिरीं मुलें
बाई ग देवाघरचीं फुलें !
बोल बोबडे बालकांचे
कुंभ भरले अमृताचे
भाग्य मागिल जन्माचें—
मोहरून आलें ! बाई ग देवाघरचीं फुलें

मूल लेणें सौभाग्याचें
वरदान देवाजींचें
गोड हांसणें बाळाचें—
सौख्य सांठविलें ! बाई ग देवाघरचीं फुलें !

मोद आईच्या मनाचा
त्याच्या इवल्याशा मुठींत
प्रीतीचें ग प्रतिबिंब
सोनुल्याच्या डोळ्यांत
संसाराची वेल सुमंगल
सुमनांनीं या फुले ! बाई ग देवाघरचीं फुलें !

# माझें नांव विचारूं नका

: १५ :

माझें नांव विचारूं नका
अनामिका मी देवाघरची, भाग्यवती गायिका !

जन्मभरी मी नाचत राहिन
भगवंताची कीर्ति गाइन
संत जनांची भगिनी होइन

पुसूं नका हो जातगोत मज, केवळ भजनें ऐका !

सदेह असुनी विदेह झालें
नातेगोतें विसरुनी गेलें
विश्वचि सारें माझें, झालें

नाहिं कुणाची भीति, प्रीति, स्वतंत्र मी गायिका !

# धुंद येथ मी—

: १६ :

धुंद येथ मी स्वैर झोकितों मद्याचे प्याले
याचवेळिं तूं असशिल तेथें बाळा पाजविलें
येथ विजेचे दिवे फेंकती उघड्यावर पाप
ज्योत समइची असेल उजाळित तव मुख निष्पाप
माझ्या कानीं घुमती गाणीं मादक मायावी
ओठांवरती असेल तुझिया अमृतमय ओंवी
माझ्यावरती खिळली येथें विषयांची दृष्टी
मत्पूजेस्तव असशिल शोधित सखे स्वप्नसृष्टी
कनकांगीच्या मत्त चुंबनें जाग मला आली
विरहाश्रू तव असेल झरला सुकलेल्या गालीं
प्राणवल्लभे, असशिल आतां अळवित भूपाळी
स्वरानुरोधें येइल वेडे दिनकर आभाळीं
थांब थोडकी माझ्यासाठीं वाढुंदेच रात्र
निशादेविचें राज्य होउंदे पुनरपि सर्वत्र
चंद्र मुखाचा तुझ्या दिसूंदे अंधुक गगनांत
आणि पडूं दे असाच मजला शय्येवर येथ
तुझें नि माझें अंतर व्हावें कसें एकरूप ?
शीलवती तूं पतिव्रते, मी मूर्तिमंत पाप !

# अशा पावसांत ग



अशा पावसांत ग
तूं जाउं नको नारी
तुझी साडि भिजल् जरतारी

रात झालीया दाट
तुझी चुकेल वाट
काशि जाशील तूं माहेरीं
अशा पावसांत ग

नदी नाले ओढे
तुला घालतिल कोडें
कशि जाशील पैल्यातिरीं
अशा पावसांत ग

कर शब्दाचा मान
नको सोडूंस भान
रहा इथंच रातभरी
अशा पावसांत ग

# ललकारी

ललकारी, ललकारी
राया माझा ग मोटेवरी
नंदी जाती भराभरा
मोट वर ये कशि झराझरा
थारोळ्यांत
पडे झोत
पाणी नाचे त्या तालावरी
राया माझा ग मोटेवरी
डुले उसाचा मळा
पाटांत पाणी खळाखळा
पंचम सुर वर गाइ कोकिळा
कांटा फुले माझ्या अंगावरी
राया माझा ग मोटेवरी !
नजर होइना कशी वर !
उरीं भरे कां असं कांपरं ?
लाली खुले माझ्या गालांवरी
राया माझा ग मोटेवरी !

# हीच मळ्याची वाट



हीच मळ्याची वाट
पाणंदीतिल तांबडमाती
श्रावणधारा तीवर झरती
शिवेलगतच्या वळणावरती
हिरवें इरलें घेउन राही जांभुळ ती घनदाट
हीच मळ्याची वाट !

सुरपारंबी इथें खेळलों
या बांधावर कितिदां बसलों
गूज मनाचें तुला बोललों
तालीवरल्या आंब्याखालीं पडली पहिली गांठ
हीच मळ्याची वाट !

तीच वाट ही, तशींच वळणें
तोच माळ अन् तशींच कुरणें
रूप परी तें तुझें देखणें
आज घडीला कुठुनी यावें माझ्या पाठोपाठ
हीच मळ्याची वाट !

# घ्या अखेरचा मुजरा

घ्या अखेरचा मुजरा
चाललों परत माझिया घरां

दारिं थबकला रथ सोन्याचा
धनी उतरला तिन्ही जगाचा
हाच मुराळी अमरपुराचा

हरिनामाचा गजर करा
चाललों परत माझिया घरां

तुमचि आमुची वाट वेगळी
नात्यांचीहि तुटे सांखळी
विसरा, अथवा स्मरा मंडळी

येणार नाहिं मी माघारां
चाललों परत माझिया घरां !

# वाजवी पावा गोविंद



शरदाचें चांदणे
मधुवनीं फुलला निशिगंध
नाचतो गोपीजनवृंद
वाजवी पांवा गोविंद

पैंजण रुणझुणतीं
मेखला कटिंवर किणकिणती
वाहते यमुनाजळ धुंद
वाजवी पांवा गोविंद

वारा झुळझुळतो
फुलांचा सुगंध दरवळतो
सांडतो भरुनी आनंद
वाजवी पांवा गोविंद

धरूनिया फेर हरीभंवतीं
गोजिऱ्या गोपी गुणगुणती:
आगळा रासाचा छंद । वाजवी पांवा गोविंद

# अपराध मीच केला

: २२ :

तोः—अपराध मीच केला, शिक्षा तुझ्या कपाळीं
जाणीव हीच माझ्या जीवां सदैव जाळा
तीः—जन्मांत एक झाली ही प्रीतभेट देवा
डोळ्यांतुनी हळूं या, हृदयांत पाय ठेवा
बोलूं न द्यायची मी, भलतेंच लाभवेळीं
अपराध मीच केला, शिक्षा तुझ्या कपाळीं
तोः—राष्ट्रार्थ जन्मलेला, मी पाहुणा क्षणाचा
भासांत गुंतवावा मी जीव कां कुणाचा
अक्षम्य चूक झाली, मी प्रीत दाखवीली
अपराध मीच केला, शिक्षा तुझ्या कपाळीं
तीः—तू लाख पीडितांचा, आधार अन् विसांवा
हा पोंच मूढ माझ्या, प्रीतीस कां नसावा ?
मी संत मोहवीला, जो मग्न संतमेळीं
अपराध मीच केला, शिक्षा तुझ्या कपाळीं
तोः—आतां पुढील जन्मीं संसार मी करनि
ही स्वप्नभेट अवक्षी मी तोंवरी धरीन
तीः—सद्भाग्य हें सतीचें मिरवीन नित्य भाळीं
अपराध मीच केला, शिक्षा तुझ्या कपाळीं

# एक भाबडी मैनाराणी

: २३

एक भाबडी मैनाराणी,
नांदत होती हिरव्या रानीं
कोठरांत ती लपुनी छपुनी
कधीं गुणगुणें मंजुळ गाणीं
रसरंगेला राघू कोणी
भिरभिरतांना थांबे गगनीं
गोड लकेरी येतां कानीं,
तोहि उतरला हिरव्या रानीं
संगत केली डोळ्यांनीं,
ओळख केली सादांनीं
रान भारिलें नादांनीं
अवचित मैना तिथें टाकुंनी
फिरता राघू गेला उडुनी;
झुरत राहिली हिरव्या रानीं
अजुनि भाबडी मैनाराणी

# वन्द्य "वन्दे मातरम्" : २४ :

वेदमंत्रांहून आह्मां वंद्य " वंदेमातरम् "

माऊलीच्या मुक्ततेचा यज्ञ झाला भारतीं
त्यांत लाखों वीर देती जीवितांच्या आहुती
आहुतींनीं सिद्ध केला मंत्र " वंदेमातरम् "

याच मंत्रानें मृताचें राष्ट्र सारें जागलें
शस्त्रधारी निष्ठुरांशीं शांतिवादी झुंजलें
शस्त्रहीनां एक लाभे शस्त्र " वंदेमातरम् "

निर्मिला हा मंत्र ज्यांनीं आचरिला झुंजुनी
ते हुतात्मे देव झाले स्वर्गलोकीं जाऊनी
गा तयांच्या आरतीचें गीत " वंदेमातरम् "

# झडल्या भेरी झडतो डंका



झडल्या भेरी, झडतो डंका
पुढचें पाउल पुढेंच टाका
तोंड लागलें आज लढ्याला
चहूंबाजुनीं येइल घाला
छातीवरती शस्त्रें झेला
फिरूं नका रे डरूं नका

शपथ तुम्हांला शिवरायांची,
मराठमोळ्या मर्दुमकीची,
समर्थगुरुची श्रीटिळकांची
विजयाच्या या ऐका हांका

निशाण आपुलें ऊंच धरा
शूरपणाची शर्थ करा
कराच किंवा रणीं मरा
बहाद्दरानो, मरणां जिंका.

# ऊठ सांवळ्या



ऊठ सांवळ्या गोविंदा रे, फुटे गाउल्यांना पान्हा
हंबरती बोलाविती, तुज लडिवाळा कान्हा

ऊठ सांवळ्या गोविंदा रे, पैंजणाचा ऐक नाद
पाणियासी जातां जातां, देती गवळणी साद

ऊठ सांवळ्या गोविंदा रे, गोपबाळ आले दारीं
गाई वांसरें सांगाती, दह्याभाताची शिदोरी

ऊठ सांवळ्या गोविंदा रे, सारें जागलें गोकुळ
उदयाचलिं आला देव, झालें सोन्याचें आभाळ

# एका सुरांत घुंगरू बोले

: २७ :

एक सुरांत घुंगरु बोले
जोडी बैलांची डौलांत चाले रे सजणा चाले

पाणि मोत्यांच्या झोतापरी;
पाटापाटांत झुळुझुळु करी
ओल्या वाफ्यांत मोतिया डोले

बाग रायाचा आला भरां,
जाईजुई फुलें मोगरा
सोनें शेवंतिला लागलें

डेरेदार ग आंब्यावरी
काळी मैना कुहुकुहु करी
गाणें गाण्यांत मिळुनी गेलें

# चल ग सये वारुळाला



चल ग सये वारुळाला वारुळाला वारुळाला ग
नागोबाला पूजायाला पूजायाला पूजायाला ग

नागोबाचं अंथरुण, निजले वरीं नारायण
साती फडा उभारून, धरति धरी सांवरुन
दूध लाह्या वाहूं त्याला, वाहूं त्याला नागोबाला

बारा घरच्या बाराजणी बाराजणी बाराजणी
रुपवंती कुंवारिणी कुंवारिणी कुंवारिणी
नागोबाची पुजूं फणी, कुंकवाचा मागुं धनी
राजपद मागुं त्याला, मागुं त्याला, नागोबाला

बालपणा त्याला वाहूं, त्याला वाहूं, त्याला वाहूं ग
नागिणीचा रंग घेऊं रंग घेऊं रंग घेऊं ग
नागोबाला फूल वाहूं, लालमणी माथी लेवूं ग
औक्ष मागूं कुंकवाला कुंकवाला बाई कुंकवाला

## रुणझुणत्या पांखरा : २९ :

रुणझुणत्या पांखरा,
तूं जा माझ्या माहेरां

सांग जा आईला तूं सांग जा भाईला
सांग जा बहिणीला तूं सांग जा वहिनीला

गुणाचि मी गुणवंति,
आवडते भरतारा

चांदीच्या तोड्यांत बाई चंदेरी साड्यांत
चौसोपी वाड्यांत मी हिंडते माड्यांत

आनंदी ग नणंदा माझ्या, मायाळू सासरा
हौसेनें वागतें मी सेवेला जागतें

गोडीनें नांदतें मी सुखसारें भोगतें
महिन्यानं यायाचं फळ माझ्या सौंसारा

# वृंदावनीं कुणी बाई

: ३० :

वृंदावनीं कुणि बाई तुळस लाविली ?

वारियाच्या झुळुकिनं हळुंच डोलली

तुळसितळीं वास करी, गोकुळिंचा कृष्णहरी

गोविंदाच्या प्रीतीची ही झुलत साऊली

उन्हं कोंवळीं सोनेरी, तुळशीच्या रोपांवरीं

माझ्या मनीं कुणि आलं चोरपाउलीं

तुळशीचं रोप झुलं, सोनियानं बाई न्हालं

शेवंतीची कांति माझ्या शरिरिं हांसली !

# मनोरथा, चल त्या नगरीला : ३१ :

मनोरथा, चल त्या नगरीला
भू-लोकींच्या अमरावतीला

स्वप्नमार्ग हा नटे फुलांनीं
सडे शिंपिले चंद्रकरांनीं
शीतल वारा सारथि होउनी-
आयोध्येच्या नेइ दिशेला
मनोरथा, चल त्या नगरीला

सर्व सुखांचा मेघ सांवळा
रघुनंदन मी पाहीन डोळां
दोन करांची करुनि मेखला
मी वाहिन माझ्या देवाला
मनोरथा, चल त्या नगरीला

# उद्यांच होशिल राणी

: ३२ :

मंगलवाद्यें झडतीं गाती तुझ्या रुपाचीं गाणीं ग
उद्यांच होशिल राणी ग

तुझ्या मनाचा सागर मथिणें मन्मथासही साधेना
गुणरत्नांची पारख तुझिया कुबेरासही होईना
देशदेशचे राजे जमले स्वयंवराच्या स्थानीं ग !
उद्यांच होशिल राणी ग

शिवधनु मोडिल, शौर्यें जोडिल शतजन्माचें नातें ग
भाग्यवान बघ निरखुन यांतिल डोळे लववुन सीते ग
नांव तयाचें हळुच सांगना वाकुन माझ्या कानीं ग !
उद्यांच होशिल राणी ग

अंगराज हा, वंगराज हा, चोलनरपती चतुर अती
सौराष्ट्राचे वैदर्भाचे राज्य-धुरंधर बघ नृपती
किती जणांची ओळख सांगू शिणली माझी वाणी ग
उद्यांच होशिल राणी ग

शुभे पाहण्या उभे तापसी तुझें स्वयंवर नवलाचें
शिवधनुला त्या लाविल दोरी, भाग्य एवढें कोणाचें
जिंकिल त्याच्या देवपणाची सुरनर गातिल गाणीं ग
उद्यांच होशिल राणी ग

# हें वदन तुझें कीं



हें वदन तुझें कीं कमल निळें
कां नयन पाहतां होति खुळे
विशाल झाले शांत सरोवर
नयनांपुढती अथांग सागर
शेषशायि तव रूप मनोहर
हलकें हलकें वर उजळें

कुठें सख्यांचा मेळा लपला
कोठें उपवन कोठें मिथिला
श्री विष्णू तूं मी तर कमला
शतजन्म चुरिन मी पदकमलें २

# एक गुपित सांगते : ३४ :

एक गुपित सांगते तुला
आवडसी तूं मला
श्यामला गुपित सांगते तुला

दिवसां नयनी
रात्रीं स्वप्नीं
हंससि तूं कोमला
श्यामला गुपित सांगते तुला

अशीच प्रतिमा असा पितांबर
असेच डोळे, सतेज सुंदर
असाच हंसरा भाव मुखावर
मी गतजन्मी पाहिला
श्यामला गुपित सांगते तुला

सांग प्रिया ही ओळख कुठली
किती युगांनीं आजच पटली
कण कण काया माझी नटली
जीव गडे लोभला
श्यामला गुपित सांगते तुला

# ओटि भरा चांदण्यांत

: ३५ :

ओटि भरा चांदण्यांत, बांधा सौख्याचे झोपाळे
महाराणी कौसल्येला, सखे लागले डोहाळे

फिकटली अंगकांती, जडावले बाई डोळे
महाराणी कौसल्येला, सखे लागले डोहाळे
पुसतील महाराज, राणी पाहुनी एकटी
उचलून हनुवटी, कर गुंफुनीया कटी
सांग सारंगलोचने, तुझी आवडी वेल्हाळे
महाराणी कौसल्येला, सखे लागले डोहाळे

राणी म्हणे "जावे वाटे, दूर दूर अरण्यांत
रानफुलांशीं हांसत, पांखरांशीं गाणीं गात
ओलांडावे आवडीनें, गिरी दूरचे जांभळे
महाराणी कौसल्येला, सखे लागले डोहाळे

लाडक्या या लावण्याचे, राया पुरवावे कोड
माझ्या जिवाच्या वेलीला, फळ लागायाचे गोड
पाळण्यांत जोजवीन, रम्य रूपडें सांवळें"
अयोध्येच्या सम्राज्ञीला राया लागले डोहाळे

# मी तुझ्या कांतिचें वल्कल ल्यालें : ३६ :

मी तुझ्या कांतिचें वल्कल ल्यालें
तुझें नाम वदनीं रे तुझें रूप नयनीं
श्री विष्णू तूं असती माझ्या मनिंच्या सिंहासनीं

विशाल विष्णू रूप पहाते मी श्यामल गगनीं
स्पर्श सुखाचा मोक्ष मिरविती रानलता सुमनीं
प्रभुजी तुझें नाम वदनीं, तुझें रूप नयनीं

निर्झर गातीं गाणीं
ती तुझीच अमृतवाणी
चंद्र प्रकाशे, सूर्य झळाळे
ते तुझेच दोन्ही डोळे
उषा आणखी संध्या फेकिति केशर तुझिया स्तवनीं

# चांदण्यांत चालुं दे

: ३७ :

चांदण्यांत चालुं दे मंद नाव नाविका
तरंगती जलावरीं संथ चंद्रचांद्रिका

नकोच आज बोलणें
बोलुं देत लोचनें
लोचनांत रंगल्या, भावना अनामिका

तूंच साथ दे मला
तूंच हात दे मला
तूंच ने तुझ्यासवें, मंत्रमुग्ध बालिका

भाव जे आंसावले
तुझ्यांत ते विसावले
नकोस होउं रे कधीं, संगतीस पारखा

# देव जेवला हो

: ३८ :

देव जेवला हो देव जेवला
ह्या ह्या डोळ्यांनीं मी पाहिला !

कमरेवरचा काढुनी हात
कालविला दूधभात

मोडि मुरडीचा कानवला
देव जेवला हो देव जेवला

ओरपली त्यानें खीर
तोंडिं लाविली कोशिंबिर

भुरका साराचा मारिला
देव जेवला हो देव जेवला

# चला, सख्यांनो हलक्या हातें : ३९ :

चला सख्यांनो हलक्या हातें नखांनखांवर रंग भरा
नखांनखांवर रंग भरा

आज सावलीपरी जायचें त्यांच्या मागें पाउल ग
पायीं पैंजण बांधा द्याया आगमनाची चाहुल ग
सिंहकटीवर स्वैर खेळुं द्या रत्नमेखला सैल जरा
नखांनखांवर रंग भरा

बाहूंवरती बांधा बाई बाहुभूषणें नागाचीं
अंचलिं झांका हृदयावरचीं कमळें हीं अनुरागाची
गळ्यांत घाला हार साजिरा पदकीं त्याच्या दिव्य हिरा
नखांनखांवर रंग भरा

वेणी गुंफा मदनबाण वर भंवती हिरवा मरवा ग
आकाशांतिल नक्षत्रांसम माथीं मोती जडवा ग
सौभाग्याच्या नगरां नेतें सौंदर्याचा थाट पुरा
नखांनखांवर रंग भरा

# प्रभात समयो पातला : ४० :

प्रभात समयो पातला, आतां जाग बा विठ्ठला !
दारीं तव नामाचा चालला गजरु
देव, देवांगना गाती नारद तुंबरु
दिंड्या पताकांचा मेळा तुझिया अंगणिं थाटला !

दिठी दिठी लागली तुझिया श्रीमुखकमळावरी
श्रवणिंमुखीं रंगली श्रीधरा नामाची माधुरी
प्राणांची आरती, काकडा नयनीं चेतविला !
प्रभात समयो पातला, आतां जाग बा विठ्ठला !

# कां असा गेलास तूं

: ४१ :

कां असा गेलास तूं ना बोलतां ना सांगतां
दो दिसांच्या संगतीची हीच कां रे सांगता

भावमाला लोपल्या ओठिंच्या ओठींच कां
फुलविली तूं लाज गालीं सुकविण्यासाठींच कां
पुसुन गेल्या रंगरेखा चित्र अपुरें रंगता

दूर व्हाया जवळ आलीं काय वेडीं पांखरें ?
ये पुन्हां ये राजहंसा पंखिं जीवा झांक रे
हांक मारूं मी कशी रे गूंज फुटतें बोलतां

ठाउका ना ठाव कोठें मार्ग नाहीं माहिती
शोध घ्याया अंतरींचे नेत्र माझे धांवती
ये उदारा राजसा रे आसरा दे मागतां

# विझले रत्न दीप गगनांत



विझले रत्न दीप गगनांत नभरात
आतां जागे व्हा यदुनाथ

अंधारांतुन प्रकाश निवळे
हलके हलके पूर्वा उजळे
दंवबिंदूचे मोती झाले पर्णाच्या तबकांत

जागी झाली सुवर्ण नगरी
अरूणासह ये उषा सुंदरी
सोन्याची नव-प्रभा पसरली सोन्याच्या दारांत

# तुज आठवतो कां बालपणा ?



वत्सला—आठवतो कां बालपण
तुज आठवतो कां बालपणा ?
बालपणांतील सहवासाच्या
थोर जाहल्या आज खुणा
अभिमन्यु-उद्यानांतील ही पुष्करणी
वत्सला—हळूंच खुडिली कमळे कोणी ?
अभिमन्यु-कुणी गुंफिला हार मनोहर
आणि वाहिला सांग कुणा ?
अभिमन्यु-इथे रुजविली कुणीं मालती
वत्सला—कुणी घातला मांडव भंवती
अभिमन्यु-कळ्यांत पण या तुझाच दिसतो
अबोल सुंदर गोडपणा
वत्सला—झुके डहाळी तरु मोहरला
अभिमन्यु-यास बांधिला कुणीं हिंदोला
वत्सला—कुणी चढविला वरती झोला
हात लाविण्या रे गगनां ?

# झाला महार पंढरीनाथ

: ४४ :

झाला महार पंढरीनाथ
काय देवाची सांगू मात

नेसला मळिण चिंधोटी
घेतली हातामधिं काठी
घोंगडी टाकिली पाठी
करि जोहार दरबारांत

मुंडाशात बांधली चिठ्ठी
फेकतो दुरुन जगजेठी
दामाजीनं विकली जी कोठी
त्याचं घ्यावं दाम पदरांत

खळखळा ओतिल्या मोहोरा
घ्या, जी मोजून पावती करा
ढीग बघुन चमकल्या नजरा
शहा घाली बोट तोंडात